**कंत्राटदार नोंदणीचे सुधारित नियम**
**(रु.१.५० कोटी पर्यंतच्या कामांकरीता एकच कंत्राटदार वर्ग ठेवून रु.१.५० कोटीपेक्षा जास्त रकमेच्या कामांकरीता कंत्राटदार नोंदणी रद्द करण्याबाबत.)**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : - सीएटी -१०९६/प्र.क्र.१७२/इमा-२**
**( संकीर्ण- २०१७/प्र.क्र. ९४/इमारती-२)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक - १६ ऑगस्ट, २०१७

वाचा:- १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्रमांक सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.२०/०४/१९९८
२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्रमांक सीएटी-२०१७/प्र.क्र.८/इमारती-२, दि.१२/०४/२०१७ व दि.२९/६/२०१७ चे शुध्दीपत्रक.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.२०/०४/१९९८ अन्वये कंत्राटदारांच्या नोंदणीबाबतचे सुधारीत नियम निर्गमित करण्यात आले आहेत. त्यानुषंगाने पाटबंधारे विभाग व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भान्वये वेळोवेळी त्यामधील सुधारणांबाबतही आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

सद्य:स्थितीत सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत शासन निर्णय सीएटी-३/२०१३/ प्र.क्र.१०२/ इमारती-२, दिनांक ३०/०६/२०१४ अन्वये कंत्राटदारांची नोंदणी Online करण्यात येते. शासन निर्णय सीएटी-२०१७ /प्र.क्र. ८/ इमा-२, दिनांक १२/४/२०१७ अन्वये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ई-निविदा प्रक्रीयेअंतर्गत निविदा प्रसिध्दी निविदा लिफाफे उघडणे आणि निविदा तपासणी व स्वीकृती याबाबत एकत्रित सुधारीत सूचना निर्गमित केल्या आहेत. सदर शासन निर्णयामधील परिच्छेद क्रमांक ६ अन्वये शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र शासन सार्वजनिक बांधकाम विभागाची नियम पुस्तिका सहावी आवृत्ती १९८४ आणि यापूर्वी निविदा विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध शासन निर्णय/परिपत्रके हे अधिक्रमित करण्यात आले आहेत. या बाबतीतील निविदा विषयक अन्य शासन निर्णय /परिपत्रके यातील आदेश यामुळे

आपोआपच रद्द होतील असेही नमूद करण्यात आले आहे. तसेच परिच्छेद क्र. २.९१ अन्वये निकोप स्पर्धा व्हावी व जास्तीत जास्त स्पर्धात्मक देकार मिळावेत यासाठी खुल्या निविदा सूचना प्रसारीत करुन निविदा मसुदयामध्ये, निविदा सादर करणारे कंत्राटदार सार्वजनिक बांधकाम विभागाकडे पंजीकृत कंत्राटदार असणे आवश्यक नाही, अशी अट नमूद करण्याबाबत निर्देश देण्यांत आले आहेत.

तद्नंतर दि.१२/४/२०१७ च्या शासन निर्णय दि.२९/६/२०१७ रोजी शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात आले आहे. सदर शुध्दीपत्रकानुसार सा.बां.विभागातील रुपये १.५० कोटी पर्यंत रकमेच्या कामांकरिता कंत्राटदार सा.बां. विभागाकडे नोंदणीकृत असणे अनिवार्य करण्यात आले आहे.

उपरोक्त बाबी विचारात घेता सार्वजनिक बांधकाम विभागात रु. १.५० कोटी पेक्षा जास्त रकमेच्या कामांसाठी नोंदणीकृत कंत्राटदारांची आवश्यकता नसल्याने सार्वजनिक बांधकाम विभागातील रु. १.५० कोटी वरील कामांकरिता कंत्राटदार नोंदणी पद्धत संपुष्टात आणण्यात येत आहे, यानुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१) सार्वजनिक बांधकाम विभागातील नोंदणी इतर विभागातही ग्राहय असल्याने संबंधित विभागास त्यांचेकडे कंत्राटदार नोंदणी प्रक्रिया दि. २१.८.२०१७ पर्यंत कार्यान्वित ठेवावी.

२) सद्यस्थितीत कंत्राटदारांची नोंदणी online असल्याने सार्वजनिक बांधकाम विभागाच्या विविध जिल्हा नोंदणी समितीकडे दि. २१.८.२०१७ पर्यंत प्राप्त कंत्राटदार नोंदणी प्रस्तावांवर कार्यवाही करण्यात यावी.

३) दिनांक २१.८.२०१७ नंतर सार्वजनिक बांधकाम विभागाची सर्व ( वर्ग ३, २, १क, १ब व १अ ) वर्गांची कंत्राटदारांची नोंदणी संपुष्टात येईल.

४) तद्नंतर कंत्राटदारांचे ( रु. १.५० कोटी किंमतीपर्यंत ) नोंदणीकृत व अनोंदणीकृत असे २ प्रकार अस्तित्वात असतील.

५) रुपये १.५० कोटी पर्यंतची नोंदणीकृत कंत्राटदार असणे अनिवार्य असल्याने रुपये १.५० कोटी चा एकच वर्ग अस्तित्वात राहील.

नोंदणी प्रक्रिया कंत्राटदराचे Solvency Certificate, मागील ३ वर्षातील पूर्ण केलेली कामे, चालू असलेली कामे, इतर आवश्यक शासकीय नोंदणीकरणे जसे Income Tax Clearance, GST इत्यादी माहितीसह On Line फी भरल्यानंतर नोंदणी प्रक्रिया करुन (Cashless/Faceless तसेच without Human interference Self-registration system) सदर नोंदणी प्रमाणपत्र On Line उपलब्ध करेल.

६) आज वैध असलेले सर्व वर्गातील नोंदणी प्रमाणपत्र त्यांच्या अंतिम वैध तारखेपर्यंत वैध असतील. तद्नंतर ते आपोआप व्यपगत होतील.

७) सदर बाब शासनाच्या Online Registration च्या वेबसाईटवर ITCC, नागपूर यांनी प्रसिध्द करावी. तसेच सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत रु.१.५० कोटी पर्यंत एकच कंत्राटदार नोंदणी वर्ग प्रक्रिया (Cashless/Faceless तसेच without Human interference Self-registration system) तयार करुन शासन मान्यता प्राप्त करण्याबाबत कार्यवाही करावी.

या शासन निर्णयाचे काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता कृपया सर्व संबंधित विभागांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०८१८१२५८०८९०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sachin M Chivate

Digitally signed by Sachin M Chivate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=P W D, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6e7b26851b8dfa36d6a3064f810d85d8a1472436e83e5056505816231cebe9fa, cn=Sachin M Chivate
Date: 2017.08.18 12:49:22 +05'30'

**( सचिन चिवटे )**
अवर सचिव

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई,

२) मा. मंत्री ( सार्वजनिक बांधकाम ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव र्व मंत्रालयीन विभाग
६) महालेखापाल १ मुंबई
७) महालेखापाल २, नागपूर
८) अधिदान व लेखा अधिकारी मुंबई/नागपूर

**प्रत-**

महासंचालक, माहिती व प्रसिद्धी महासंचालनालय, मुंबई यांना प्रसिद्धीसाठी

**प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी :-**

१) सर्व मुख्य अभियंते, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग (विद्युतसह )
२) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
३) संचालक, उद्याने व उपवने, मुंबई,
४) सर्व अधीक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग (विद्युत/यांत्रिकी )
अधीक्षक अभियंता यांनी आपल्या अधिनस्त विभागातील कार्यालयांना सदर शासन निर्णयाची प्रत अग्रेषित करावी.
५) मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता, पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई,
६) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
७) कार्यासन इमारती २ (निवड नस्ती ).